**विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.३, भंडारा या उपविभागाचे मुख्यालय <u>गडचिरोली येथे स्थलांतरीत करणे.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आढावा-२०१७/२०७/प्र.क्र.८९/२०१७/आ.(प्रशि)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २६ मे, २०१७

<u>वाचा</u> :- १. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि.८.३.१९८४.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.१०९२/सीआर-८०६/व्यय-६, दि.१५.१०.१९९२.
३. शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.आढावा-१००४/२०२/०४/जवि, दि.१९.७.२००७.
४. शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.आढावा-२००८/२५/२००८/आ.(प्रशि.), दि.२६.६.२००८
५. शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.सीओई-१२१०/(१२७/२०१०)/जवि, दि.५.३.२०११.
६.शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.जविप्र-२०१५/प्रक्र.४५/२०१५/सुधा-१/ जवि,दि.४.४.२०१६.
७.शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.आढावा-२०१६/प्रक्र.१५१/२०१६/आ.(प्रशि.),दि.२१.१०.२०१६.

**<u>प्रस्तावना -</u>**

विदर्भातील सिंचनाचा अनुशेष दूर करण्यासाठी तसेच विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत उपसा सिंचन योजनांची नागपूर, भंडारा, गोंदीया, चंद्रपूर, गडचिरोली, अमरावती, अकोला, बुलढाणा-(खामगांव), वाशिम व यवतमाळ-(पुसद) या जिल्ह्यातील कामे विहित कालावधीत पूर्ण करण्यासाठी संदर्भिय अ.क्र.४, अ.क्र.५, अ.क्र.६ व अ.क्र. ७ येथील शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता (विद्युत) जलविद्युत प्रकल्प, मुंबई यांचे नियंत्रणाखाली कार्यरत मंडळ, विभाग व उपविभागीय कार्यालये मंजूर आस्थापनेसह स्थलांतरीत करण्यात आली आहेत.

त्यानुसार वर नमूद जिल्ह्यांतर्गतच्या उपसा सिंचन योजनांची व तद्नुषंगिक विद्युत कामांसाठी जिल्हानिहाय १ कार्यालय कार्यरत आहे. परंतु गडचिरोली जिल्ह्यातील सदरहू कामे भंडारा मुख्यालयी कार्यरत विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.३, भंडारा या उपविभागीय कार्यालयाकडून हाताळली जात आहेत. त्यामुळे संबंधित उपविभागाच्या मुख्यालय ठिकाणापासून त्याचे प्रत्यक्ष कार्यक्षेत्र विचारात घेता, गडचिरोली जिल्ह्यातील उक्त कामांना गती प्राप्त होण्याच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.३, भंडारा या उपविभागीय कार्यालयाचे मुख्यालय गडचिरोली येथे स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

अधीक्षक अभियंता, जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, भंडारा यांच्या नियंत्रणाखाली कार्यरत विदर्भ जलविद्युत व

उपसा सिंचन उपविभाग क्र.३, भंडारा या उपविभागीय कार्यालयाचे मुख्यालय भंडारा येथून गडचिरोली येथे स्थलांतरीत करण्यास यान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रमाणे होणाऱ्या बदलास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

(अ) उप अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.३, गडचिरोली या नावाने कार्यान्वित करण्यात यावे.

(आ)प्रशासकीय व आस्थापना खर्चात वाढ होऊ नये म्हणून विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.३, गडचिरोली हे उपविभागीय कार्यालय गडचिरोली येथील शासकीय इमारतीच्या जागेत कार्यान्वित करावे, जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

(इ) विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.३, गडचिरोली हे उपविभागीय कार्यालय, उर्वरित कार्यभार, आवश्यक सर्व कार्यालयीन अभिलेख (प्रारुप परिच्छेद, निरीक्षण अहवाल, निवृत्तीवेतन, न्यायालयीन व सेवाविषयक प्रकरणे मूळ सेवापुस्तकांसह इ. अभिलेख/ प्रकरणे) व मंजूर आस्थापना यासह गडचिरोली मुख्यालयी कार्यान्वित करण्यात यावे.

(ई) उपविभाग कार्यालयातील मंजूर पदांवरील कार्यरत अधिकाऱ्यांची नियुक्ती स्थलांतरणाने कार्यान्वित होणाऱ्या ठिकाणी करण्यात यावी. तर गट-क व गट-ड मधील मंजूर पदांवरील आवश्यक कर्मचारी स्थानिक परिमंडळ कार्यालयाने उपलब्ध करुन देण्यात यावीत.

(उ) स्थलांतरीत उपविभागीय कार्यालयाचे प्रशासकीय नियंत्रण व तांत्रिक नियंत्रण मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई यांचे अंतर्गतच राहील.

३. शासन आदेशानुसार मंजूरी दिल्याप्रमाणे पासून दिनांक १२ जून, २०१७ पासून नियोजित ठिकाणी उपविभागीय कार्यालय कार्यान्वित होईल, याद्दष्टीने मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, जलसंपदा विभाग, मुंबई यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही त्वरेने पूर्ण करावी.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक. ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/ एडीएम-९, दि.८ मार्च, १९८४ मधील तरतूदीनुसार अधीक्षक अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, नागपूर या मंडळ कार्यालयाचे अधीक्षक अभियंता यांना “नियंत्रक अधिकारी” व कार्यकारी अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, भंडारा यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२६१६४८४८७७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.05.26 16:52:55 +05'30'

( वि.का.चौधरी )

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव.
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य (सर्व)
७) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
११) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक.
१३) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१४) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) सर्व मुख्य अभियंता/ सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१६) मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई.
१७) अधीक्षक अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, नागपूर.
१८) अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) कार्यकारी अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन भंडारा.
२०) कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे. (कार्यालयांच्या मुख्यालय बदलाची आवश्यक नोंद घेण्यास्तव)
२१) उप अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.३, भंडारा.
२२) सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.

**********